**विधि व न्याय विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सह सचिव (विधि)/उप सचिव (विधि)/अवर सचिव (विधि) संवर्गातील सामायिक पदांची सद्यस्थिती व सदर पदांच्या अनुषंगाने अनुसरावयाची कार्यपध्दती.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : इएसटी २०१६/प्र.क्र.२८७/कार्यासन -दोन,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १७ डिसेंबर, २०२१.

वाचा:- १. विधि व न्याय विभाग,शासन निर्णय क्रमांक : इएसटी १२९६/११३५/का.२,दि.२६.०५.१९९८ .
२. विधि व न्याय विभाग,शासन निर्णय क्रमांक : इएसटी २०१२/प्र.क्र.२९०/का.२, दि.१२.०४.२०१३ .
३. विधि व न्याय विभाग,शासन निर्णय क्रमांक : इएसटी २०१३/प्र.क्र.९५/का.२,दि.२८.१०.२०१३.
४. उच्च स्तरीय सचिव समितीच्या दि.०३.०२.२०२१ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**प्रस्तावना :-**

विधि व न्याय विभाग , मंत्रालय ( खुद्द ) , मुंबई तसेच नागपूर व औरंगाबाद कार्यालयातील एकूण कामकाजाचा सखोल व सर्वंकष आढावा घेऊन, विभागाच्या आस्थापनेवर २९४ नियमित पदे + गट ड मधील बाह्यंत्रणेव्दारे भरावयाच्या एकूण ४० मनुष्यबळ सेवा असा एकूण ३३४ पदांच्या सुधारित आकृतीबंधास दि.०३.०२.२०२१ रोजीच्या मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सचिव समितीच्या बैठकीत मान्यता देण्यात आली आहे.

विधि व न्याय विभाग , मंत्रालय (खुद्द) च्या आस्थापनेवर " उपसचिव (विधि) " ४ पदे व " अवर सचिव (विधि) " ३ पदे हा संवर्ग स्वतंत्रपणे दर्शविण्यास उच्चस्तरीय सचिव समितीच्या दि.०३.०२.२०२१ रोजीच्या बैठकीत मान्यता देण्यात आलेली आहे . विधि व न्याय विभागाव्यतिरिक्त अन्य मंत्रालयीन प्रशासनिक विभागांच्या आस्थापनेवर मूलत: " अवर सचिव (विधि) " हे पद मंजूर असून , सदर संवर्गातील पदे आवश्यकतेनुसार " उप सचिव (विधि) " व " सह सचिव (विधि) " या पदांत श्रेणीवाढ करून पदोन्नतीने भरण्यात येतात. सारांशाने, अवर सचिव (विधि) ही पदे विधि व न्याय विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील, परंतु अन्य मंत्रालयीन विभागांच्या आस्थापनेवरील मंजूर पदे असल्याने विधि व न्याय विभागाच्या आकृतीबंधात न दर्शविता ती त्या त्या विभागांच्या आकृतीबंधामध्ये दर्शविण्यात येतात.

अवर सचिव (विधि) रिक्त पदे सरळसेवेने भरण्याकरिता महाराष्ट्र लोकसेवा आयोगास मागणीपत्र पाठविण्याच्याअनुषंगाने अवर सचिव (विधि) संवर्गातील पदांबाबतची माहिती सर्व प्रशासकीय विभागांकडून मागविण्यात आलेली होती. प्रशासकीय विभागांनी सादर केलेल्या माहितीमध्ये काही विभागांनी सुधारित केलेल्या आकृतीबंधामध्ये त्यांच्या आस्थापनेवर अवर सचिव (विधि) ऐवजी उप सचिव(विधि) पद निर्माण केल्याचे दिसून येत आहे. सबब, अवर सचिव (विधि) / उप सचिव (विधि) / सह सचिव (विधि) या संवर्गाच्या अनुषंगाने अनुसरावयाची कार्यपध्दती निश्चित करणे व त्याबाबत सर्व प्रशासकीय विभागांना सूचना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

अवर सचिव (विधि) / उप सचिव (विधि) / सह सचिव (विधि) या संवर्गामध्ये शासन निर्णयाच्या दिनांकापर्यंत विधि व न्याय विभागाच्या आस्थापनेवर तसेच मंत्रालयाच्या अन्य विभागांच्या आस्थापनेवर निर्माण केलेल्या पदांचा तपशिल खालील प्रमाणे आहे:-

| पद निर्मितीचा तपशील | अवर सचिव (विधि) | उप सचिव (विधि) | सह सचिव (विधि) |
|---|---|---|---|
| विधि व न्याय विभागासहीत अन्य मंत्रालयीन प्रशासकीय विभागांच्या आस्थापनेवर अवर सचिव(विधि) संवर्गामध्ये २३ पदे मंजूर | २३ | ०० | ०० |
| विधि व न्याय विभाग शा.नि. क्र. इएसटी १२९६/११३५/का-२, दि.२६.०५.१९९८ अन्वये अवर सचिव संवर्गातील २३ मंजूर पदांपैकी ५ पदे उप सचिव (विधि) संवर्गात कायम स्वरुपी श्रेणीवाढ करण्यात आली. | २३-५ =१८ | ५ | ० |
| विधि व न्याय विभाग शा.नि. क्र. इएसटी १००१/प्र.क्र.२३०/का-२, दि.२२.१२.२००३ अन्वये उप सचिव (विधि) १ पद नव्याने निर्माण करण्यात आले. | १८ | ५+१=६ | ० |
| विधि व न्याय विभाग शा.नि. क्र. इएसटी २०१२/प्र.क्र.२९०/का-२, दि.१२.०४.२०१३ अन्वये उप सचिव (विधि) संवर्गातील २ पदे सह सचिव (विधि) संवर्गात कायमस्वरुपी श्रेणीवाढ करण्यात आली. | १८ | ६-२=४ | २ |
| विधि व न्याय विभाग शा.नि. क्र. इएसटी २०१३/प्र.क्र.९५/का-२, दि.२८.१०.२०१३ अन्वये अवर सचिव(विधि) संवर्गातील ३ पदे उप सचिव (विधि) संवर्गात कायमस्वरुपी श्रेणीवाढ करण्यात आली. | १८-३=१५ | ४+३=७ | २ |
| विविध प्रशासकीय विभागांनी या शासन निर्णयाच्या दिनांकापर्यंत नव्याने निर्माण केलेली एकूण अवर सचिव (विधि) पदे २२ | १५+७=२२ | ७ | २ |

विधि व न्याय विभाग तसेच अन्य प्रशासकीय विभागांनी त्यांच्या आस्थापनेवर निर्माण केलेली पदे मिळून अवर सचिव (विधि) या संवर्गात सद्य:स्थितीत एकूण २२ पदे मंजूर आहेत. या शासन निर्णयाच्या दिनांकापर्यंत विधि व न्याय विभागाच्या आकृतीबंधावरील पदांसह, अन्य प्रशासकीय विभागांच्या आस्थापनेवरील अवर सचिव (विधि) संवर्गाची एकूण २२ पदे, उप सचिव (विधि) संवर्गाची एकूण ७ पदे व सह सचिव (विधि) संवर्गाची एकूण २ पदे अशी एकूण ३१ पदे आहेत.

अवर सचिव (विधि) / उप सचिव (विधि) / सह सचिव (विधि) या पदांची सामायिक ज्येष्ठतासूची व संवर्गनिहाय बिंदुनामावली विधि व न्याय विभागामार्फत तयार करण्यात येते. या पदांपैकी अवर सचिव (विधि) ही पदे सेवाप्रवेश नियमातील तरतूदीनुसार सरळसेवेने व निम्नसंवर्गातून पदोन्नतीने भरण्यात येतात. सह सचिव(विधि) व उप सचिव(विधि) संवर्गाची पदे ज्येष्ठतासूचीच्या व बिंदुनामावलीच्या आधारे निम्नसंवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीने भरली जातात.

**विधि व न्याय विभागाच्या आकृतीबंधावर अवर सचिव (विधि) संवर्गाची ३ पदे व उप सचिव (विधि) संवर्गाची ४ पदे मंजूर आहेत. तथापि, अन्य मंत्रालयीन विभागांच्या आस्थापनेवर उप सचिव (विधि) व सह सचिव (विधि) संवर्गातील पदे मंजूर नसून अवर सचिव (विधि) संवर्गातील पदे मंजूर आहेत.**

२. अवर सचिव(विधि)/उप सचिव(विधि)/सह सचिव(विधि) या संवर्गाच्या अनुषंगाने अनुसरावयाच्या कार्यपध्दतीबाबत सर्व प्रशासकीय विभागांना खालील प्रमाणे सूचना देण्यात येत आहेत-

१. विधि व न्याय विभागाच्या संदर्भ क्रमांक २ येथील दि.१२.०४.२०१३ रोजीच्या शासन निर्णयानुसार अवर सचिव (विधि) संवर्गातील जे अधिकारी उप सचिव (विधि) पदावर पदोन्नतीसाठी पात्र ठरतील, त्यांच्या पदोन्नतीचे आदेश विधि व न्याय विभागाने निर्गमित केल्यानंतर अशा अधिकाऱ्यांनी धारण केलेल्या अवर सचिव (विधि) या पदाची उपसचिव (विधि) या पदात श्रेणीवाढ करण्याची कार्यवाही संबंधित विभागाने करून योग्य ते आदेश निर्गमित करावेत.

२. उप सचिव (विधि) या श्रेणीवाढ केलेल्या पदावर कार्यरत अधिकाऱ्याची बदली अन्य मंत्रालयीन विभागाच्या आस्थापनेवर झाल्यास अथवा संबंधित अधिकारी सेवानिवृत्त झाल्यास अथवा अन्य काही कारणामुळे ते पद रिक्त झाल्यास, उप सचिव (विधि) पदात श्रेणी उन्नत केलेले पद हे पुन्हा मूळ अवर सचिव (विधि) संवर्गात श्रेणी अवनत होईल.

३. विधि व न्याय विभागाच्या संदर्भ क्रमांक ३ येथील दि.२८.१०.२०१३ रोजीच्या शासन निर्णयानुसार, उप सचिव (विधि) संवर्गातील जे अधिकारी सह सचिव (विधि) पदावर पदोन्नतीसाठी पात्र ठरतील त्यांच्या पदोन्नतीचे आदेश विधि व न्याय विभागाने निर्गमित केल्यानंतर, अशा अधिकाऱ्यांनी धारण केलेल्या उप सचिव (विधि) या पदाची सह सचिव (विधि) या पदात श्रेणीवाढ करण्याची कार्यवाही संबंधित विभागाने करून योग्य ते आदेश निर्गमित करावेत.

४. सह सचिव (विधि) या श्रेणीवाढ केलेल्या पदावर कार्यरत अधिकाऱ्याची बदली अन्य मंत्रालयीन विभागाच्या आस्थापनेवर झाल्यास अथवा संबंधित अधिकारी सेवानिवृत्त झाल्यास अथवा अन्य काही कारणामुळे ते पद रिक्त झाल्यास, उप सचिव (विधि) पदात श्रेणी उन्नत केलेले पद पुन्हा मूळ अवर सचिव (विधि) पदात श्रेणी अवनत होईल.

५. त्याचप्रमाणे, एखाद्या प्रशासकीय विभागात सह सचिव (विधि) या संवर्गाच्या अधिकाऱ्याची नियुक्ती झाल्यास, त्या विभागाचे मूळ अवर सचिव (विधि) पद सह सचिव (विधि) या पदात श्रेणीवाढ करण्याची कार्यवाही संबंधित विभागाने परस्पर करून योग्य ते आदेश निर्गमित करणे आवश्यक आहे. सह सचिव (विधि) या श्रेणीवाढ केलेल्या पदावर कार्यरत अधिकाऱ्याची बदली अन्य मंत्रालयीन विभागाच्या आस्थापनेवर झाल्यास अथवा संबंधित अधिकारी सेवानिवृत्त झाल्यास अथवा अन्य काही कारणामुळे ते पद रिक्त झाल्यास, श्रेणी उन्नत केलेले पद पुन्हा मूळ अवर सचिव (विधि) संवर्गात अवनत होईल.

**३. सर्व प्रशासकीय विभागांनी त्यांच्या आस्थापनेवर कार्यरत असलेल्या सह सचिव(विधि)/उप सचिव(विधि) /अवर सचिव(विधि) संवर्गातील पदांबाबत उपरोक्त कार्यपध्दतीचा अवलंब करावा. तसेच, वित्त विभागाच्या निर्देशानुसार, सुधारीत आकृतीबंधाचा शासन निर्णय निर्गमित करताना सर्व प्रशासकीय विभागांनी त्यांच्या आस्थापनेवर "विधि अधिकारी संवर्गातील अवर सचिव "या ऐवजी " अवर सचिव (विधि) " असेच मूळ पदनाम दर्शविण्यात यावे.**

**४. तसेच, विभागाच्या आस्थापनेवरील अवर सचिव(विधि) पद हे जर सह सचिव(विधि)/उप सचिव (विधि) संवर्गात श्रेणी उन्नत केलेले असल्यास त्याप्रमाणे "तात्पुरत्या स्वरुपात श्रेणी उन्नत" असा स्वतंत्र उल्लेख सुधारीत आकृतीबंधामध्ये करावा.**

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२११२१७१११६४७०४१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने ,

AKUSING NARSHI VASAVE

Digitally signed by AKUSING NARSHI VASAVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e13ac5693b98e2e58f350e4b67c0d9bd921a3feaf4f3c78ec08eca0027569af2, pseudonym=2EF9C763BABA14786D61CC6E4C8351F22B3DB4D6, serialNumber=EB2BD0E957284EC28B5B78A29773C41DB3573D2A35937C311BE82E541A9799CC, cn=AKUSING NARSHI VASAVE
Date: 2021.12.17 11:17:30 +05'30'

(आ. न. वसावे)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**सोबत - पदांच्या तपशिलाबाबतचे जोडपत्र**

**प्रति,**

१. प्रधान सचिव व विधि परामर्शी यांचे स्वीय सहायक , विधि व न्याय विभाग , मंत्रालय , मुंबई
२. सचिव व वरिष्ठ विधि सल्लागार यांचे स्वीय सहायक , विधि व न्याय विभाग , मंत्रालय , मुंबई
३. सचिव (विधि विधान ) यांचे स्वीय सहायक , विधि व न्याय विभाग , मंत्रालय , मुंबई
४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा ) महाराष्ट्र १, मुंबई/नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी , मुंबई
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी , मुंबई
७. सह/उप/अवर सचिव(आस्थापना / रोख शाखा) , संबंधित सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय मुंबई
८. संबंधित विभागांचे सर्व सह सचिव(विधि)/उप सचिव(विधि)/अवर सचिव(विधि).
९. निवडनस्ती.

## जोडपत्र

**अवर सचिव (विधि) , उप सचिव(विधि) व सह सचिव (विधि) एकूण पदे (एकूण पदे ३१ त्यापैकी २ पदे सह सचिव (विधि) संवर्गात व ७ पदे उप सचिव (विधि) संवर्गात कायमस्वरुपी श्रेणीवाढ करण्यात आलेली आहेत. त्यामुळे अवर सचिव(विधि) संवर्गातील एकूण पदे ३१-९=२२ पदे )**

**अवर सचिव (विधि) पदे निर्माण केलेले सर्व प्रशासकीय विभाग**

१. नगर विकास विभाग
२. अन्न व नागरी पुरवठा विभाग
३. पर्यावरण विभाग
४. वित्त विभाग
५. सहकार विभाग
६. महिला व बाल कल्याण विभाग

**(सा.प्र.वि शासन निर्णय दि.२९.१२.२०१२ नुसार २ पदे निर्माण करण्यात आली.)**

७. सा.प्र.वि खुद्द - १ पद
८. सा.प्र.वि / मुख्य सचिव कार्यालयासाठी १ पद
९. कृषि व पशुसंवर्धन विभाग
१०. गृह निर्माण विभाग
११. आदिवासी विकास विभाग
१२. ग्राम विकास व जलसंधारण विभाग
१३. जलसंपदा विभाग
१४. सार्वजनिक बांधकाम विभाग
१५. वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग
१६. महसूल व वन विभाग
१७. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

**विधि व न्याय विभागात ( एकूण ७ पदे ) उप सचिव (विधि) ४ + अवर सचिव (विधि) ३**

१८. विधि व न्याय विभाग
१९. विधि व न्याय विभाग
२०. विधि व न्याय विभाग
२१ विधि व न्याय विभाग
२२ विधि व न्याय विभाग
२३ विधि व न्याय विभाग
२४ विधि व न्याय विभाग
२५. महाराष्ट्र लोकसेवा आयोग

**(* विधि व न्याय विभागाच्या दि.२३.०४.२०१३ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र लोकसेवा आयोगाचे अवर सचिव(विधि) पद हे विधि व न्याय विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली आणण्यात आले.)**

२६. गृह विभाग

२७. शालेय शिक्षण विभाग

**२८. सार्वजनिक आरोग्य विभाग**

**२९. उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**३०.** इमाव, साशैमाप्र, विजाभज व विमाप्र कल्याण विभाग (दि.१३.९.२०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये २ पदे नव्याने निर्माण)

३१. इमाव, साशैमाप्र, विजाभज व विमाप्र कल्याण विभाग

टिप - राज्य माहिती आयोग, राज्य निवडणुक आयोग यांच्या आस्थापनेवर विधि अधिकारी पद निर्माण करण्यात आलेले असले तरीही ते विधि व न्याय विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली नसल्यामुळे त्या पदांचा या विभागाच्या नियंत्रणाखालील प्रशासनिक विभागांमध्ये समावेश करण्यात आलेला नाही.